पूर्वीची संक्षिप्त देयके प्रलंबित असतांना दुसऱ्या संक्षिप्त देयकावर निधी आहरित करून हाफकीन महामंडळाकडे वर्ग करण्यास मान्यता देणेबाबत.

---

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

शासन परिपत्रक क्रमांक : देयक- २०२०/प्र.क्र. ११४/ प्रशा-१

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,

९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१,

दिनांक : ३० मार्च, २०२०

**वाचा** :
१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक: खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक: खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८
३) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन यांचे पत्र क्रमांक: संवैशिवसं/ यसांख / संक्षिप्त देयक /१- म /१८१७ /२०२०/२०२०, दिनांक : १८.०२.२०२०
४) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन यांचे पत्र क्रमांक संवैशिवसं/ ससरूपुणे / २१सावपु / आय -१ /२०१९-२० /३०५४/२०२०, दिनांक : १७.०३.२०२०

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शासन निर्णय, दिनांक २६.०७.२०१७ अन्वये औषधे,यंत्रसामुग्री,उपकरणे इत्यादी बाबींच्या खरेदीसाठी हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळांची स्थापना करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागास औषधे, यंत्रसामुग्री व साधनसामुग्री इत्यादीसाठी प्राप्त झालेला निधी संक्षिप्त देयकावर अहारित करून हाफकीन महामंडळाकडे वर्ग करण्यात आलेला आहे. सदर निधीची तपशीलवार देयके अद्याप संबंधित संस्थांना प्राप्त झालेली नाहीत. सबब याविषयी विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय/दंत महाविद्यालये व रुग्णालये व संलग्नित संस्थांना सन २०१९-२० मध्ये विविध स्त्रोत्राद्वारे औषधे व सामुग्री (सामुग्री व पुरवठा) तसेच यंत्रसामुग्री व साधनसामुग्री याबाबींसाठी प्राप्त झालेला निधी पूर्वीची तपशीलवार देयके प्रलंबित असतांना संक्षिप्त देयकावर आहरित करून तो हाफकीन महामंडळ, मुंबई खरेदी कक्षाकडे वर्ग करण्यास सदर शासन परिपत्रकाद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे. तरी याविषयी तात्काळ कार्यवाही करावी.

२. सदर शासन परिपत्रक, वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५३/व्यय-१३, दिनांक ३०.०३.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीच्या अनुषंगाने करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३३११५०३२३३११३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN MURLIDHAR RAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI, serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.03.31 16:45:58 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - १/ २ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. प्रधान सचिव (लेवको), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो फार्मास्युटीकल्स् कॉर्पोरेशन लि., मुंबई.
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५. सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय /दंत महाविद्यालय व रुग्णालय
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखाधिकारी, मुंबई
८. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
९. कक्ष अधिकारी ( प्रशा-२) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवडनस्ती